**महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियम-२०१५ च्या अनुषंगाने राज्यातील क्षेत्रीय स्तरावर दुसऱ्या टप्प्यात प्रशिक्षण कार्यक्रम आयोजित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः टीआरएन-२०१५/प्र.क्र.१९६/१५/१२-अ**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: ०४ नोव्हेंबर, २०१५

<u>वाचा :-</u>

१) शासन निर्णय क्रमांकः टिआरएन-०९/प्र.क्र.३९/०९/१२-अ, दिनांक २३ सप्टेंबर, २०११
२) शासन निर्णय क्रमांकः टिआरएन-२०११/प्र.क्र.२८७/११/१२-अ,दि. १४ ऑक्टोबर,२०१३
३) शासन निर्णय क्रमांकः टिआरएन-२०१४/प्र.क्र.१२०/१४,दि.१३ ऑगस्ट,२०१४
४) शासन निर्णय क्रमांकः टिआरएन-२०१४/प्र.क्र.१२०/१४,दि.१२ सप्टेंबर,२०१४
५) शासन निर्णय क्रमांकः टिआरएन-२०१४/४४०/प्र.क्र.६६/१४,दि.१ नोव्हेंबर,२०१४
६) महाराष्ट्र शासन अधिनियम क्रमांक ३१, सामान्य प्रशासन विभाग दिनांक २१ ऑगस्ट,२०१५.
७) सामान्य प्रशासन विभागाचे समक्रमांकाचे दिनांक ३० सप्टेंबर,२०१५ चे शासन परिपत्रक.

<u>प्रस्तावना :-</u>

महाराष्ट्र राज्यातील पात्र नागरिकांना पारदर्शक रितीने कालबध्द सेवा प्रदान करताना सार्वजनिक प्राधिकरणांमध्ये गतीमानता व पारदर्शकता आणण्यासाठी दि.२१.८.२०१५ रोजी राजपत्राव्दारे महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियम २०१५ निर्गमित करण्यात आलेला आहे. सदर अधिनियमाव्दारे विविध विभागांशी संबंधित सुमारे २३७ लोकसेवा अधिसूचित करण्यात आलेल्या असून त्यापैकी ४६ सेवा नागरिकांना ऑनलाईन नियतकाल मर्यादेत पुरवावयाच्या आहेत.महाराष्ट्र राज्य हक्क अधिनियम-२०१५ व्दारे लोकसेवा देणाऱ्या यंत्रणेत अधिकच पारदर्शकता व उत्तरदायित्वाची जाणीव निर्माण होणार आहे. या बाबीचा विचार करता व सदर कायदा अधिक प्रभावी करण्यासाठी लोकसेवा देणाऱ्या विभागांतील अधिकाऱ्यांत सदरहू अधिनयमातील तरतूदी, नियत कालमर्यादा, लोकसेवा देण्यासाठी माहिती तंत्रज्ञानाचा वापर, उचित प्रशिक्षकाची नियुक्ती, शास्ती वसुलीची कार्यपध्दती, महाराष्ट्र राज्य सेवा हक्क आयोगाचे गठन इ. बाबत जागरूकता होणे अत्यंत आवश्यक आहे.

२. महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियमातील तरतूदींबाबत शासकीय अधिकारी/कर्मचारी यांच्यामध्ये जागरूकता यावी व याबाबत सर्व शासकीय अधिकारी/कर्मचारी यांना माहिती व्हावी यासाठी राज्य प्रशिक्षण धोरण-२०११ च्या अनुषंगाने निश्चित करण्यात आलेल्या प्रशिक्षण कार्यक्रमांनुसार महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियम मधील तरतूदींच्या अनुषंगाने नवीन विषयाची तोंडओळख प्रशिक्षण कार्यक्रम राज्यभरात राबविण्याबाबतच्या सूचना उपरोक्त संदर्भ क्र. ६ च्या शासन परिपत्रकान्वये देण्यात आल्या आहेत. त्यानुसार दिनांक ६ ऑक्टोबर,२०१५ ते ३१ ऑक्टोबर,२०१५ या कालावधीत एकदिवसीय प्रशासकीय प्रशिक्षणाचा कार्यक्रम राज्यात सर्वत्र राबविण्यात आला आहे. त्यानुसार सद्यस्थितीत राज्यातील सर्व जिल्हा व विभाग स्तरावरील **२८०२** प्रशिक्षकांना व **२८६५५** अधिकारी/कर्मचारी अशा राज्यातील एकूण **३१४५७** अधिकारी/कर्मचारी यांना महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियमाबाबत प्रशिक्षीत करण्यात आले आहे.

सदर प्रशिक्षण कार्यक्रमाच्या पहिल्या टप्प्याचे प्रशिक्षण यशस्वीरीत्या राज्यात सर्वत्र घेण्यात आले आहे. त्याचप्रमाणे, आता प्रशिक्षणाच्या दुसऱ्या टप्प्यात राज्यातील क्षेत्रीय स्तरावरील ज्यांचे प्रशिक्षण व्हायचे आहे अशा, अधिकारी/कर्मचारी यांना महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियमाच्या

अनुषंगाने प्रशिक्षीत करणे आवश्यक आहे. यासाठी जिल्हा/उपविभाग/तालुका स्तरावर महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियम-२०१५ च्या अनुषंगाने प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्यासाठी आवश्यक त्या सूचना सदर परिपत्रकान्वये देण्यात येत आहेत.

**शासन परिपत्रक :-**

महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियमात एकूण २३७ सेवा अंतर्भूत करण्यात आल्या आहेत. दिनांक २.१०.२०१५ रोजी नुकत्याच ४६ सेवा नागरीकांना उपलब्ध करून देण्यात आलेल्या आहेत. सदर सेवा **विवरणपत्र-अ** प्रमाणे आहेत. तसेच, महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियमांतर्गत अधिसूचित करण्यात आलेल्या मात्र नागरीकांना ऑनलाईन उपलब्ध करून न दिलेल्या सेवा **विवरणपत्र ब** प्रमाणे आहे. तेव्हा महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियमात अंतर्भूत केलेल्या सेवांवर सदर एकदिवसीय प्रशिक्षण कार्यक्रमात भर देण्यात यावा. महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियमांतर्गत अधिसूचित केलेल्या सेवांशी निगडीत व अद्याप नागरीकांना ऑनलाईन उपलब्ध करून न दिलेल्या सेवांशी निगडीत खात्यामधील अधिकारी/कर्मचारी यांना प्रशिक्षीत करण्यासाठी आवश्यक त्या सूचना खालीलप्रमाणे देण्यात येत आहे.

**A) नामनिर्देशने करण्याची पद्धत : -**

अ) प्रशिक्षण कार्यक्रमाच्या दुस-या टप्प्यात महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियमांतर्गत अधिसूचित केलेल्या सेवांशी निगडीत व अद्याप नागरिकांना ऑनलाईन उपलब्ध करून न दिलेल्या सेवांशी निगडीत खात्यांमधील जिल्हास्तरीय / तालुकास्तरीय खाते प्रमुख यांची जिल्हा स्तरावर संबंधित जिल्हाधिकारी यांनी **माहे नोव्हेंबरच्या पाहिल्या आठवडयात** बैठक आयोजित करावी.

ब) त्यानंतर **जिल्हास्तरीय व तालुकास्तरीय खाते प्रमुख** यांनी खालील प्रमाणे उल्लेखित संबंधितांची नामनिर्देशने **दिनांक ०९/११/२०१५ पर्यंत संबंधित जिल्हाधिकारी यांच्याकडे** पाठवावीत. नामनिर्देशनांचे सनियंत्रण करण्याची जबाबदारी जिल्हाधिकारी यांचेवर सोपविण्यात येत आहे.

a. अधिसूचित केलेल्या व नागरिकांना ऑनलाईन उपलब्ध करून दिलेल्या सेवांशी निगडीत खात्यामधील उर्वरित सर्व पदनिर्देशित अधिकारी, प्रथम अपिल प्राधिकारी, द्वितीय अपिल प्राधिकारी व सक्षम प्राधिकारी / कार्यालय प्रमुख.
b. अधिसूचित केलेल्या मात्र नागरिकांना ऑनलाईन उपलब्ध करून न दिलेल्या सेवांशी निगडीत खात्यांमधील अधिकारी व कर्मचारी.
c. जनतेला सेवा देण्याशी निगडीत उर्वरित सर्व स्थानिक / सार्वजनिक प्राधिकरणाचे सर्व पदनिर्देशित अधिकारी, प्रथम अपिल प्राधिकारी, द्वितीय अपिल प्राधिकारी व सक्षम प्राधिकारी/ कार्यालय प्रमुख.
d. सेवा हक्क अधिनियमाशी निगडीत / जनतेला सेवा देण्याशी निगडीत उर्वरित इतर अधिकारी व कर्मचारी

**B. प्रशिक्षणाचा कालावधी:-**

सदरहू प्रशिक्षण कार्यक्रम **१६ नोव्हेंबर, २०१५ ते ५ डिसेंबर,२०१५** या कालावधीत घेण्यात येईल. सदरहू प्रशिक्षण कार्यक्रम एक दिवसीय अनिवासी स्वरूपाचे व सकाळी ९.३० ते ५.३० या कालावधीत घेण्यात येतील .

**C.प्रशिक्षणाचे ठिकाण :-**

प्रशिक्षण कार्यक्रम गरजेनुरूप जिल्हा, उपविभाग व तालुका मुख्यालयाच्या ठिकाणी आयोजित करण्यात येतील.

**D.प्रशिक्षण कार्यक्रमांची दर दिवशीची संख्या :-**

एका दिवसात कमीत-कमी दोन प्रशिक्षण कार्यक्रम आयोजित करण्यात येतील.सोयी-सुविधा उपलब्ध असल्यास प्रत्येक दिवशी त्यापेक्षा अधिक कार्यक्रम आयोजित करता येतील. अशा प्रकारे जिल्हा, उपविभाग व तालुका मुख्यालयाच्या ठिकाणी मिळून प्रत्येक जिल्ह्यात एकूण ११०० ते १४०० अधिकारी/कर्मचारी यांचे प्रशिक्षण घेणे अपेक्षित आहे.

**E.प्रशिक्षणासाठी सोयी-सुविधा :-**

सदरहू प्रशिक्षण कार्यक्रमासाठी ६० प्रशिक्षणार्थींची बैठकव्यवस्था होऊ शकेल असे सभागृह, लॅपटॉप/कॉम्प्युटर सह प्रोजेक्टर, दोन वेळचा चहा,नाश्ता व दुपारचे भोजन इ. व्यवस्था करण्याची जबाबदारी संबंधित जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्थेची राहील. उपरोक्त सोयी-सुविधांच्या उपलब्धतेबाबत जिल्हाधिकारी यांनी व्यक्तीश: खातरजमा करावी.

**F.प्रशिक्षणाचे आयोजन :-**

जिल्ह्याचे जिल्हाधिकारी यांच्या मार्गदर्शनाखाली संबंधित जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्था सदरहू प्रशिक्षण कार्यक्रमाचे आयोजन करतील. या कालावधीत यशदाचे पालक अधिकारी यांनी जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्थांना सर्वप्रकारचे मार्गदर्शन करून संनियंत्रण करावे.

**G.प्रशिक्षणासाठी स्टेशनरी व वाचन साहित्य :-**

प्रशिक्षणासाठी नोट पॅड, पेन, जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्थेमार्फत देण्यात येतील. वाचन साहित्य म्हणून अधिनियमाची प्रत, प्लॅन ऑफ ॲक्शन व अधिनियम संबंधित प्रपत्रे यशदाकडून सशुल्क सर्व जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्थांना पुरविण्यात येतील.

**H.प्रशिक्षणासाठी प्रशिक्षक :-**

यशदाचे पालक अधिकारी, यशदामार्फत विकसित केलेले प्रशिक्षण संस्थांचे प्रशिक्षक /संबंधित खात्यांचे प्रशिक्षक व ई-जिल्हा प्रकल्प व्यवस्थापक (e - District Project Manager) हे सर्व प्रशिक्षक म्हणून काम पाहतील.

**I.प्रशिक्षणासाठी निधी :-**

सदर प्रशिक्षण हे अनिवासी स्वरूपाचे असून जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्थांना प्रशिक्षणासाठी रू. ७५०/- प्रति प्रशिक्षणार्थी प्रति दिवस या दराने निधी राज्य प्रशिक्षण धोरणांतर्गत आर्थिक तरतुदीतून यशदामार्फत सामान्य प्रशासन विभागाकडून देण्यात येईल.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१५११०४१७५६००८३०७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhagwan Sahai

Digitally signed by Bhagwan Sahai
DN: c=IN, o=All India Service, ou=IAS, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Bhagwan Sahai
Date: 2015.11.05 11:13:56 +05'30'

**( डॉ.भगवान सहाय )**
**अपर मुख्य सचिव (सेवा) , महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,मंत्रालय, मुंबई-३२.

३. मा. सभापती, महाराष्ट्र विधान परिषद, विधान भवन, मुंबई.
४. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधान सभा, विधान भवन, मुंबई.
५. मा. विरोधी पक्ष नेता, विधानसभा/विधानपरिषद महाराष्ट्र,मुंबई.
६. विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
७. सर्व मा. मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
८. सर्व सन्माननीय विधानसभा/विधानपरिषद सदस्य महाराष्ट्र विधानमंडळ,सचिवालय, विधानभवन, मुंबई.
९. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-३२.
१०.सर्व अपर मुख्य सचिव, प्रधान सचिव, सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग.
११.प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई. *
१२.सर्व विभागीय आयुक्त, महाराष्ट्र राज्य.
१३.महासंचालक, माहिती व जनसंपर्क, मंत्रालय, मुंबई (५ प्रती).
१४.महासंचालक, यशदा, बाणेर रोड, पुणे-४११ ००७
१५.उपमहासंचालक/संचालक,रा.प्र.नि.मु.यं,यशदा,बाणेर रोड,पुणे-४११ ००७
१६.महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता,महाराष्ट्र-१, मुंबई
१७.महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता,महाराष्ट्र-१, नागपूर
१८. महालेखापाल, लेखा परीक्षा,महाराष्ट्र-१, मुंबई
१९.महालेखापाल, लेखा परीक्षा,महाराष्ट्र-१, नागपूर
२०.जिल्हाधिकारी, सर्व जिल्हे.
२०. सर्व विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्थांचे संचालक
२१. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद(सर्व)
२२.सर्व विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्थाचे संचालक.
२३.सर्व जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्थांचे प्राचार्य/विशेष कार्य अधिकारी/संचालक.
२४.यशदाचे सर्व पालक अधिकारी.
२५.सर्व मंत्रालयीन विभाग व त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालये /प्रशिक्षण संस्था
२६.मंत्रालय मध्यवर्ती ग्रंथालय(२ प्रती).
२७. प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई, औरंगाबाद, नागपूर *
२८. प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई, औरंगाबाद, नागपूर*
२९. प्रबंधक, लोक आयुक्त आणि उपलोकआयुक्त कार्यालय, मुंबई *
३०. अपर मुख्य सचिव (सेवा ) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२
३१. निवड नस्ती-१२-अ, साप्रवि, मंत्रालय, मुंबई-३२
*पत्राने

# महाराष्ट्र लोकसेवा हमी अधिनियम-२०१५ मध्ये अधिसूचित करण्यात आलेल्या व ऑनलाईन उपलब्ध करून देण्यात आलेल्या सेवांची यादी

## विवरणपत्र -अ

| अधिसूचित करण्यात आलेल्या व महाराष्ट्र शासनाच्या आपले सरकार पोर्टल वर ऑनलाईन उपलब्ध करून देण्यात आलेल्या एकूण सेवा ( ४६) | | |
|---|---|---|
| अ.क्र. | विभागाचे नाव व विभागाच्या अधिसूचित करण्यात आलेल्या सेवा | |
| १) | ग्रामविकास व पंचायतराज विभाग (१० सेवा) | |
| | १) जन्म नोंद दाखला | २) मृत्यु दाखला |
| | ३) विवाह नोंदणी दाखला | ४) रहिवाशी प्रमाणपत्र |
| | ५) दारिद्य रेषेखाली असल्याचा दाखला | ६) हयातीचा दाखला |
| | ७) ग्रामपंचायत येणे बाकी दाखला | ८) निराधार असल्याचा दाखला |
| | ९) शौचालयाचा दाखला | १०) विधवा असल्याचा दाखला |
| २) | उद्योग ऊर्जा व कामगार विभाग (७ सेवा) | |
| | A) कामगार विभाग (५ सेवा) | |
| | १) दुकाने आणि आस्थापना नोंदणी | २) दुकाने आणि अस्थापना नुतनीकरण |
| | ३) कंत्राटी कामगार मुख्य मालक नोंदणी | ४) कंत्राटी कामगार अनुज्ञप्ती नोंदणी |
| | ५) कंत्राटी कामगार अनुज्ञप्ती नुतनीकरण | |
| | B) शासन मुद्रण लेखनसामग्री व प्रकाशन संचालनालय (२ सेवा) | |
| | १) वाणिज्यिक संस्था व खाजगी पक्ष यांनी काढलेल्या अधिसूचना, सूचना व जाहीराती स्विकारून महाराष्ट्र शासन राजपत्र भाग २ - संकिर्ण सूचना व जाहिराती या राजपत्राच्या भागात प्रसिध्द करणे व ते त्यांना ऑनलाईन व ईमेलवर उपलब्ध करून देणे. | २) महाराष्ट्र शासन राजपत्र भाग दोन-नाव, जन्मतारीख(वय) आणि धर्म बदलण्याच्या जाहिराती संचालनालयाच्या संकेतस्थळावर ऑनलाईन स्विकारून राजपत्राच्या भागात प्रसिध्द करणे आणि ते नागरीकांना ऑनलाईन उपलब्ध करून देणे. |
| ३) | कौशल्य विकास आणि उद्योजकता विभाग (२ सेवा) | |
| | १) नोकरी उत्सुक उमेदवारांची नोंदणी | २) सेवानियोजकाची नोंदणी |
| ४) | महसूल व वन विभाग (एकूण २५ सेवा) | |
| | A) वन विभाग (१० सेवा) | |
| | १) तेंदुपाने कंत्राटदार/उत्पादक यांची नोंदणी करणे | २) बांबू पूरविणेसाठी नवीन बुरड कामगारांची नोंदणी करणे |
| | ३) वन्यप्राण्यांच्या हल्ल्यामुळे झालेल्या पशु नुकसानीची नुकसानभरपाई मंजुर करणे | ४) वन्यप्राण्यांच्या हल्ल्यामुळे व्यक्ती जखमी किंवा मृत झाल्यास आर्थिक सहाय्य मंजुर करणे |

| | | |
|---|---|---|
| | ५) वन्यजीव क्षेत्रात पर्यटन हंगामात फोटाग्राफिसाठी परवानगी( वृत्त स्तर) | ६) वन्यजीव क्षेत्रात पर्यटन हंगामात फोटाग्राफिसाठी परवानगी(एकापेक्षा अधिक वृत्तांसाठी) |
| | ७) वन्यप्राण्यांच्या हानीमुळे झालेल्या पीक नुकसानीकरीता नुकसानभरपाई मंजुर करणे | ८) अनुज्ञप्ती प्राधिकारी यांनी आरागिरणी परवाना नुतनीकरणाबाबत घेतलेला निर्णय कळविणे |
| | ९) महाराष्ट्र वृक्षतोड) विनियमन (अधिनियम १९६४ नुसार संपूर्ण दस्तऐवजांसह अर्ज प्राप्तीनंतर वृक्ष अधिकारी यांनी अनुसूचित जमातीच्या भोगवटादारांच्या मालकीच्या वृक्षतोडीसाठी परवानगी देण्याबाबत घेतलेला निर्णय कळविणे. | १०) महाराष्ट्र वृक्षतोड) विनियमन (अधिनियम १९६४ नुसार संपूर्ण दस्तऐवजांसह अर्ज प्राप्तीनंतर वृक्ष अधिकारी यांनी बिगर आदिवासी अर्जदारास वृक्षतोडीसाठी परवानगी देण्याबाबत घेतलेला निर्णय कळविणे. |
| | B) नोंदणी व मुद्रांक विभाग (३) | |
| | १) शोध उपलब्ध करणे | २) मुद्रांक शुल्क भरण्याचे प्रयोजनार्थ मुल्यांकन अहवाल देणे |
| | ३) दस्त नोंदणी न केलेल्या प्रकरणांमध्ये ई-पेमेंट पध्दतीने भरलेल्या नोंदणी फी चा परतावा. | |
| | C) महसूल विभाग(१२ सेवा) | |
| | १) वय,राष्ट्रीयत्व आणि अधिवास प्रमाणपत्र | २) प्रतिज्ञापत्र साक्षांकित करणे |
| | ३) उत्पन्न प्रमाणपत्र | ४) तात्पुरता रहिवास प्रमाणपत्र |
| | ५) ज्येष्ठ नागरिक प्रमाणपत्र | ६) ऐपतीचा दाखला |
| | ७) सांस्कृतिक कार्यक्रम परवाना | ८) अधिकार अभिलेखाची प्रमाणित प्रत |
| | ९) अल्पभू-धारक दाखला | १०) भूमीहीन शेतमजूर असल्याचा दाखला |
| | ११) शेतकरी असल्याचा दाखला | १२) डोंगर/दुर्गम क्षेत्रात राहत असल्याचे प्रमाणपत्र |
| ५) | जलसंपदा विभाग (२ सेवा) | |
| | १) जलसंपदा विभागाच्या प्रकल्पातून घरगुती (पिण्याचे पाणी) प्रयोजनासाठीचे बिगरसिंचन पाणी आरक्षण मंजूर करणेबाबत. | २) जलसंपदा विभागाच्या प्रकल्पातून औद्योगीक प्रयोजनासाठीचे बिगरसिंचन पाणी आरक्षण मंजूर करणेबाबत. |

महाराष्ट्र लोकसेवा हमी अधिनियम-२०१५ मध्ये अद्याप अधिसूचित करण्यात न आलेल्या व ऑनलाईन उपलब्ध करून देण्यात न आलेल्या सेवांची यादी

## विवरणपत्र -ब

| अ.क्र. | विभागाचे नाव व विभागाच्या अधिसूचित करण्यात आलेल्या मात्र महाराष्ट्र शासनाच्या आपले सरकार पोर्टल वर ऑनलाईन उपलब्ध करून देण्यात न आलेल्या सेवा | |
|---|---|---|
| १) | ग्राम विकास व जलसंधारण विभाग ( ३ सेवा ) | |
| | १) नमुना ८चा उतारा | २) परित्यक्ता असल्याचा दाखला |
| | ३) विभक्त कुटूंबाचा दाखला | |
| २) | गृह विभाग (३१ सेवा) | |
| | A) गृह विभाग ( १७ सेवा ) | |
| | १) विदेशी कलाकाराच्या सहभागास परवानगी | २) कागदपत्रांचे साक्षांकन |
| | ३) भारतीय नागरिंकासाठी “नोरी” प्रमाणपत्र | ४) पोलिस क्लिअरन्स प्रमाणपत्र |
| | ५) विदेशी नागरिकांचे नागरिकत्वाचे प्रस्ताव केंद्र शासनास पाठविणे | ६) तक्रारदारास प्रथम खबरी अहवालाची (FIR) प्रत पुरविणे |
| | ७) ध्वनीक्षेपकाचा परवाना देणे | ८) मनोरंजनाचे कार्यक्रमांना ना हरकत परवाना देणे |
| | ९) सभा,संमेलन ,मिरवणूक ,शोभा यात्रा इ .करिता परवानगी देणे | १०) विदेशी नागरिकांना निवासासाठी मुदत वाढ देणे / ना हरकत प्रमाणपत्र देणे |
| | ११) भारत देशात परत येणासाठी ना हरकत प्रमाणपत्र देणे | १२) पारपत्र पडताळणीसाठी ना हरकत प्रमाणपत्र देणे |
| | १३) निमशासकीय ,खाजगी संस्था इ.मध्ये नोकरीकरिता वर्तणूक व चारित्र्य पडताळणी प्रमाणपत्र देणे | १४) पेट्रोल पंप ,गॅस एजन्सी ,हॉटेल ,बार इ.करिता ना हरकत प्रमाणपत्र देणे |
| | १५) शस्त्र परवान्यासाठी ना हरकत प्रमाणपत्र देणे | १६) भारतीय नागरिकांना परदेशात जाण्यासाठी पोलीस अनुमती प्रमाणपत्र देणे. (शिक्षणासाठी / नोकरीसाठी प्रवेशपत्र (व्हीसा) |
| | १७) तिबेटीयन नागरिकांना भारत देशात परत येण्यासाठी ना हरकत प्रमाणपत्र देणे | |
| | B) परिवहन विभाग (१४ सेवा ) | |
| | १) शिकाऊ अनुज्ञप्ती जारी करणे | २) पक्की चालन (Driving) अनुज्ञप्ती जारी करणे |
| | ३) अनुज्ञप्ती नुतनीकरण करणे | ४) दुय्यम अनुज्ञप्ती जारी करणे |
| | ५) दुय्यम वाहन नोंदणी प्रमाणपत्र जारी करणे | ६) तात्पुरते नोंदणी प्रमाणपत्र जारी करणे |
| | ७) नवीन वाहन नोंदणी करणे आणि नोंदणी प्रमाणपत्र जारी करणे | ८) वाहनांच्या मालकीच्या हस्तांतरणाची नोंद करणे |
| | ९) वाहन मालकाच्या मृत्युनंतर वाहनांच्या हस्तांतरणाची नोंद करणे | १०) वाहन हस्तांतरणासाठी ना-हरकत प्रमाणपत्र जारी करणे |

| | | |
|---|---|---|
| | ११) पत्ता बदलण्यासाठी ना-हरकत प्रमाणपत्र जारी करणे | १२) भाडे खरेदी ,भाडे/ गहाण करार नोंद रद्द करणे |
| | १३) इतर राज्यातून आलेल्या वाहनांना नोंदणी क्रमांक जारी करणे | १४) भाडे खरेदी ,भाडे/ गहाण करार नोंद करणे |
| ३) | **कृषी व पदुम विभाग (३१ सेवा)** | |
| | **A) कृषि व पदुम विभाग /कृषि विभाग-कृषि आयुक्त ( १५ सेवा )** | |
| | १) माती व पाणी नमुना तपासणी | २) लागवड साहित्य आयात करण्याकरीता उत्पादकता प्रमाणपत्र देणे. |
| | ३) निर्यात होणाऱ्या कृषि मालास फायटोसॅनिटरी प्रमाणपत्र देणे. | ४) निर्यातक्षम द्राक्ष बागांना युरोपिअन देशांना निर्यातीसाठी " अपेडा " च्या "ग्रेपनेट" प्रणाली अंतर्गत नोंदणी प्रमाणपत्र देणे / नूतनीकरण करणे. |
| | ५) निर्यातक्षम आंबा बागांना युरोपिअन देशांना निर्यातीसाठी " अपेडा " च्या "मँगोनेट" प्रणाली अंतर्गत नोंदणी प्रमाणपत्र देणे / नूतनीकरण करणे. | ६) निर्यातक्षम डाळींब बागांना युरोपिअन देशांना निर्यातीसाठी " अपेडा " च्या "अनारनेट" प्रणाली अंतर्गत नोंदणी प्रमाणपत्र देणे / नूतनीकरण करणे. |
| | ७) विक्रीयोग्य फळांच्या कलमे / रोपे विक्रीस परवाना देणे. | ८) बियाणे नमुने तपासणी |
| | ९) खत नमुने तपासणी | १०) किटकनाशक नमुने तपासणी |
| | ११) कृषि उत्पादनातील उर्वरित अंश तपासणी | १२) बियाणे विक्री परवाना ( राज्यस्तर) |
| | १३) खत निर्मिती / विक्री प्रमाणपत्र देणे ( राज्यस्तर ) | १४) किटकनाशके उत्पादन / विक्री परवाना देणे ( राज्यस्तर ) |
| | १५) ठिबक संच उत्पादक नोंदणी | |
| | **B) कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय व मत्स्यव्यवसाय विभाग ( पदुम ) ( १६ सेवा )** | |
| | १) पशुचे खच्चिकरण | २) औषधोपचार |
| | ३) वंध्यत्व तपासणी(भा.प.वै.कायद्यानुसार) | ४) शवविच्छेदन(न कुजलेले मृत प्राणी सादर केल्यास) |
| | ५) पशुंची नमुने तपासणी(आजारी पशु दवाखान्याच्या वेळेमध्ये आणल्यास) | ६) आरोग्य तपासणी व दाखला देणे |
| | ७) गर्भ तपासणी(गायी व म्हशींची) | ८) गायी व म्हशींना कृत्रिम रेतन करणे |
| | ९) पशुसंवर्धन विभागात कार्यरत असलेल्या अंडी उबवणी केंद्र,कुक्कट विकास गट व कुक्कटपालनाचे लाभार्थींना प्रशिक्षण देणे | १०) इच्छुक बेरोजगार तरूण/व्यक्तींना स्वयंरोजगारविषयक प्रशिक्षण देणे |
| | ११) मासेमार नौकांचे ऑनलाइन पद्धतीने नोंदणी | १२) मच्छिमार नौकांसाठी ऑनलाइन पद्धतीने मासेमारी परवाना |
| | १३) तारोपोरवाला मत्स्यालयाचे ऑनलाइन तिकीट वितरण | १४) मच्छिमारांसाठी मासेमारी परवाना |
| | १५) मच्छिमार संस्थांची ऑनलाइन पद्धतीने नोंदणी | १६) ऑनलाइन रजिस्ट्रेशन ऑफ अक्वाकल्चर पाँड व फिश सीड सेंटर |
| ४) | **नगरविकास विभाग ( १५ सेवा)** | |
| | १) जन्म प्रमाणपत्र देणे | २) मृत्यु प्रमाणपत्र देणे |
| | ३) विवाह नोंदणी प्रमाणपत्र देणे | ४) मालमत्ता कर उतारा देणे |
| | ५) थकबाकी नसल्याचा दाखल देणे | ६) अ) दस्तऐवजाच्या आधारे मालमत्ता हस्तांतरण नोंद प्रमाणपत्र देणे |

| | | |
|---|---|---|
| | | ब) वारसा हक्काने मालमत्ता हस्तांतरण नोंद प्रमाणपत्र देणे |
| | ७) झोन दाखला देणे | ८) भाग नकाशा देणे |
| | ९) बांधकाम परवाना देणे | १०) जोते प्रमाणपत्र |
| | ११) भोगवटा प्रमाणपत्र देणे | १२) नळजोडणी देणे |
| | १३) जलनि:सारण जोडणी देणे | १४) अग्निशमन ना-हरकत दाखला देणे |
| | १५) अग्निशमन अंतिम ना-हरकत दाखला देणे | |
| ५) | **विधी व न्याय विभाग (३ सेवा)** | |
| | १) राज्य विधिसेवा प्राधिकरणाने द्यावयाचे कायदेविषयक मोफत सहाय्य | २) महाराष्ट्र सार्वजनिक विश्वस्त व्यवस्था अधिनियमाच्या तरतुदींनुसार सार्वजनिक विश्वस्त व्यवस्थांची नोंदणी (एक) मुंबईमध्ये (दोन) इतर जिल्ह्यांमध्ये |
| | ३) भागीदारी संस्था अधिनियम, १९५२ अन्वये भागीदारी संस्थेची नोंदणी (एक) मुंबईमध्ये (दोन) औरंगाबाद, नागपूर व पुणे येथे. | |
| ६) | **अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग (७ सेवा)** | |
| | १) नवीन शिधापत्रिका मागणी | २) शिधापत्रिकेतील नावात दुरूस्ती/नावे समाविष्ट करणे/नाव कमी करणे/पत्ता बदल करणे |
| | ३) दुय्यम शिधापत्रिका(खराब/फाटलेली), दुय्यम शिधापत्रिका(गहाळ शिधापत्रिका | ४) नवीन रास्तभाव दुकानाची मागणी |
| | ५) रास्तभाव दुकानाच्या परवान्याचे नूतनीकरण | ६) किरकोळ रॉकेल विक्री परवाने |
| | ७) किरकोळ रॉकेल विक्री परवान्याचे नूतनीकरण | |
| ७) | **गृहनिर्माण विभाग (२० सेवा)** | |
| | **A) झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण (३ सेवा)** | |
| | १) वारस हस्तांतरण विषयक सेवा | २) भोगवटा प्रमाणपत्र प्राप्त झालेनंतर १० वर्षांनी सदनिका हस्तांतरण विषयक सेवा |
| | ३) झोपडपट्टी पुनर्वसन योजनेतील सहकारी गृहनिर्माण संस्थांची नोंदणी विषयक सेवा | |
| | **B) महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण (१२ सेवा)** | |
| | १) निवासी सदनिका/भूखंड भेगवटाबद्दल (हस्तांतरण) | २) अनिवासी सदनिका/भूखंड भेगवटाबद्दल (हस्तांतरण) |
| | ३) निवासी सदनिका/भूखंड नियमितीकरण | ४) अनिवासी सदनिका/भूखंड नियमितीकरण |

| | | |
|---|---|---|
| | ५) थकबाकीबाबतचे ना-देय प्रमाणपत्र | ६) सदनिका/भूखंड/व्यापारी गाळा वित्तीय संस्थेकडे तारण ठेवण्यास ना-हरकत प्रमाणपत्र |
| | ७) सदनिका/ व्यापारी गाळा विक्री परवानगी | ८) भूखंड विक्री परवानगी |
| | ९) भूखंडाची उर्वरित खरेदी किंमत(बी.पी.पी.) कर्जाची थकबाकी भरणा पत्र | १०) सदनिकेची उर्वरित भाडेखरेदी हप्ता(एच.पी.एस.भरणा पत्र) |
| | ११) सदनिका/भूखंड/व्यापारी गाळयांच्या नस्तीतील कागदपत्रांच्या प्रमाणित प्रती | १२) निवासी सदनिका भाडे तत्त्वावर देण्यास ना-हरकत प्रमाणपत्र देणे |
| | **C) मुंबई इमारत दुरूस्ती व पुनर्वसन मंडळ (४ सेवा)** | |
| | १) निवासी सदनिका/भूखंड भेगवटाबद्दल (हस्तांतरण) | २) अनिवासी सदनिका/भूखंड भेगवटाबद्दल (हस्तांतरण) |
| | ३) निवासी सदनिका/भूखंड नियमितीकरण | ४) अनिवासी सदनिका/भूखंड नियमितीकरण |
| | **D) अप्पर जिल्हाधिकारी(अतिक्रमण/निष्कासन) पूर्व/पश्चिम उपनगरे (१ सेवा)** | |
| | १) महाराष्ट्र झोपडपट्टी क्षेत्र(सुधारणा निर्मूलन व पुनर्विकास) अधिनियम,१९७१ मधील तरतूदीनुसार या परिशिष्टाच्या रकाना क्र.४ मध्ये अधिसूचित केलेल्या पदनिर्देशित अधिका-यांचे कार्यक्षेत्रातील पात्र झोपडीधारकांना ओळखपत्र निर्गमित करणे | |
| ८) | **महिला व बाल विकास विभाग (१३ सेवा)** | |
| | १) गरोदर स्त्रियांची अंगणवाडीमध्ये नोंदणी | २) ६ महिने ते ३ वर्षांच्या बालकांची अंगणवाडीमध्ये नोंदणी |
| | ३) ३ते ६ वर्षांच्या बालकांची अंगणवाडीमध्ये नोंदणी | ४) इंदिरा गांधी मातृत्त्व योजनेंतर्गत गरोदर स्त्रियांना आर्थिक मदत ( सदर योजना सध्या अमरावती व बुलढाणा जिल्ह्यात कार्यरत आहे. ) |
| | ५) सबला योजना : पौगंडावस्थेतील मुलींची नोंदणी (सध्या ११ जिल्ह्यांमध्ये योजना कार्यरत ) | ६) किशोरी शक्ती योजना : पौगंडावस्थेतील मुलींची नोंदणी (सध्या २३ जिल्ह्यांमध्ये योजना कार्यरत ) |
| | ७) नोकरी करणाऱ्या महिलांसाठी वसतिगृह निर्माण करण्याबाबत अनिवासी भारतीयांच्या केंद्र शासनास शिफारशी | ८) मनोधैर्य योजनेंतर्गत बळी पडलेल्या व्यक्तींना वित्तीय सहाय्य |
| | ९) मुलांना सीसीआयएस / ऑब्झर्वेशन होम मध्ये प्रवेश | १०) आपद्ग्रस्त महिलांना शेल्टर होममध्ये प्रवेश |
| | ११) भीक मागणाऱ्या महिला / पुरुषांना बेगर्स होम मध्ये प्रवेश | १२) आयआयटीआयएएनएस पेस योजनेंतर्गत विद्यार्थीनींना वित्तीय सहाय्य |
| | १३) अनिवासी भारतीय / संस्था यांना काऊन्सिलींग सेंटरसाठी अनुदान | |
| ९) | **अल्पसंख्याक विकास विभाग (१ सेवा)** | |
| | १) राज्यातील अल्पसंख्याक संस्थांना धार्मिक / भाषिक अल्पसंख्याक दर्जा घटनेच्या कलम ३० (१) नॅशनल मायनॉरिटी एज्युकेशनल ॲक्टच्या कलम २ (जी) नुसार प्रदान करणे | |

| | | |
|---|---|---|
| १०) | उदयोग,उर्जा व कामगार विभाग (२६ सेवा) | |
| | १) उदयोग विभाग | |
| | A) विकास आयुक्त उदयोग संचालनालय यांनी अधिसूचित करावयाच्या १० सेवा | |
| | १) सामूहिक प्रोत्साहन योजना २०१३ अंतर्गत मुद्रांक शुल्क माफिचे प्रमाणपत्र | २) सामूहिक प्रोत्साहन योजना २०१३ अंतर्गत पात्रता प्रमाणपत्र अदा करणे |
| | ३) सामूहिक प्रोत्साहन योजना २०13 अंतर्गत औद्योगिक प्रोत्साहन अनुदानाच्या दाव्यास मंजुरी | ४) मुंबई कुळ वहिवाट व शेत जमीन कायदा १९४८ सुधारणा १९९४ अंतर्गत ख-याखु-या औद्योगिक प्रयोजनासाठी १० हेक्टरपेक्षा जास्त शेतजमीन खरेदीसाठी आवश्यक असलेली पुर्व परवानगी |
| | ५)खाजगी माहिती तंत्रज्ञान उदयानांना इरादा पत्र देणे | ६)खाजगी माहिती तंत्रज्ञान घटकांना नोंदणी प्रमाणपत्र देणे |
| | ७)खाजगी जैव तंत्रज्ञान उदयानांना इरादा पत्र देणे. | ८)खाजगी जैव तंत्रज्ञान घटकांना नोंदणी प्रमाणपत्र देणे |
| | ९) सूक्ष्म लघु व मध्यम उपक्रम अंतर्गत उद्योजकांसाठी एंटरप्रायझेस मेमोरेंडम भाग-१ | १०) सूक्ष्म लघु व मध्यम उपक्रम अंतर्गत उद्योजकांसाठी एंटरप्रायझेस मेमोरेंडम भाग-२ |
| | B) महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ,मुंबई यांनी अधिसूचित करावयाच्या ७ सेवा | |
| | १)इमारत नकाशे मंजूरी, अग्निशामन ना हरकत प्रमाणपत्र,तात्पुरती नळ जोडणी,सांडपाणी नि:सारण नकाशे | २)अंतिम अग्निशामन यंत्रणा मंजूरी |
| | ३)इमारत पुर्णत्व प्रमाणपत्र/भोगवटा प्रमाणपत्र | ४)कायम पाणीपुरवठा नळ जोडणी |
| | ५)मुंबई प्रदेश महानगरामधील महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाच्या कार्यक्षेत्रातील माहिती तंत्रज्ञान उदयोगांना ना हरकत प्रमाणपत्र | ६)मुंबई प्रदेश महानगरामधील महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाच्या क्षेत्रातील माहिती तंत्रज्ञान कंपन्यांना माहिती तंत्रज्ञान धोरणांतर्गत इरादापत्रे |
| | ७) मुंबई प्रदेश महानगरामधील महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाच्या क्षेत्रात माहिती तंत्रज्ञान धोरणांतर्गत कंपन्यांची नोंदणी करणे | |
| | C) कामगार आयुक्त यांनी अधिसूचित करावयाच्या सेवा (३ सेवा) | |
| | १) इमारत व इतर बांधकाम मजूर)नोकरीचे नियमन आणि शर्ती( अधिनियम, १९९६ अंतर्गत आस्थापनांची नोंदणी. | २) मोटार परिवहन कामगार अधिनियम १९६१ अंतर्गत नोंदणी |
| | ३) बिडी आणि सिगार (नोकरीच्या शर्ती) वर्क्स अधिनियम १९६६ अंतर्गत औद्योगिक वस्तुंची नोंदणी. | |
| | D) बाष्पके संचालनालय (२ सेवा) | |
| | १) मालकी हक्काचे हस्तांतरण | २) प्रमाणपत्राची नक्कल करणे |
| | | |

| | | |
|---|---|---|
| | २)कामगार विभाग (४ सेवा) | |
| | A) औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालयामार्फत | |
| | १)कारखाने अधिनियम १९४८ च्या महाराष्ट्र कारखाने नियम, १९६३ अन्वये नकाशे मंजूर करणे | २)कारखाने अधिनियम १९४८ च्या महाराष्ट्र कारखाने नियम, १९६३अंतर्गत नोंदणी व परवाना देणे. |
| | ३)कारखाने अधिनियम १९४८ च्या महाराष्ट्र कारखाने नियम, १९६३अंतर्गत नोंदणी व परवाना नूतनीकरण करणे. | ४)कारखाने अधिनियम १९४८ च्या महाराष्ट्र कारखाने नियम, १९६३दुय्यम परवाना देणे /परवाना दुरूस्ती करणे. |
| ११) | वित्त विभाग (७ सेवा) | |
| | A) सेवा संचालक,विमा संचालनालय (१ सेवा) | |
| | १) नविन विमा जोखीम स्वीकारणे<br>( प्रस्तावाची छाननी व विमा हप्ता कळविणे) | |
| | B) सेवा संचालक, लेखा व कोषागरे ( २ सेवा ) | |
| | १) मासिक निवृत्तीवेतन /कुटुंबनिवृत्तीवेतन | २) मुद्रांक वितरीत करणे. |
| | C) सेवा आयुक्त,विक्रीकर विभाग (४ सेवा) | |
| | १) ई-नोंदणी | २) ई-केंद्रिय विक्रीकर वैधानिक नमुने |
| | ३) ई-विवरणे | ४) ई-करभरणा |
| १२) | जलसंपदा विभाग (८ सेवा ) | |
| | १) पाणी वापर संस्थेस देय पाणी हक्क मंजूरी देणे. | २) पाणी वापर संस्थेस पाणीपट्टी थकबाकी दाखला देणे. |
| | ३) बिगर सिंचनाची पाणीपट्टी थकबाकी दाखला देणे. | ४) पाणीपट्टी देयक तक्रार निवारण करणे |
| | ५) लाभक्षेत्राचा दाखला देणे. | ६) महानगर पालिका,खाजगी विकासक,विशेष नगर विकास प्रकल्प यांना घरगुती/ औद्योगिक पाणी वापर परवाना देणे |
| | ७) नदी जलाशया पासून अंतराचा दाखला देणे. | ८) उपसा सिंचन परवानगी |
| १३) | सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग ( ५ सेवा ) | |
| | १) सहकारी संस्थांची नोंदणी करणे | २) सहकारी संस्थांची उपविधी दुरूस्ती करणे |
| | ३) सावकारी व्यवसायासाठी परवाना देणे | ४) सावकारी व्यवसायासाठी परवाना नूतनीकरण देणे |
| | ५) सहकारी गृहनिर्माण संस्थांचे मानीव अभिहस्तांतरण | |

| | | |
|---|---|---|
| १४) | **पाणी, पुरवठा व स्वच्छता विभाग (५ सेवा)** | |
| | **A) महाराष्ट्र जीवन प्राधिकरण ( २ सेवा)** | |
| | १) नळ जोडणी देणे | २) पाणी बील देयकासंबधी तक्रारीचे निवारण करणे |
| | **B) भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा ( ३सेवा)** | |
| | १) विंधन विहिर सर्वेक्षण | २) वाळू उत्खनन सर्वेक्षण |
| | ३) भूजल सर्वेक्षण प्रमाणपत्र देणे | |
| १५) | **सार्वजनिक आरोग्य विभाग (३ सेवा)** | |
| | १) ऑन लाईन सॉफ्टवेअर माध्यमातून अपंगत्त्व प्रमाणपत्र प्रदान करणे | २) जननी सुरक्षा योजना |
| | ३) जननी शिशु सुरक्षा योजना | |
| १६) | **महसूल व वन विभाग (१३ सेवा)** | |
| | **A) नोंदणी व मुद्रांक शुल्क ( १३ सेवा )** | |
| | १) दस्त नोंदणी करणे | २) दस्ताच्या सूचीची प्रमाणित नक्कल देणे. |
| | ३) दस्ताची प्रमाणित नक्कल देणे. | ४) नोटीस ऑफ इंटिमेशन फाईल करून देणे. |
| | ५) दस्त नोंदणी संदर्भात गृहभेट देणे | ६) विशेष कुलमुखत्यारपत्राचे अधिप्रमाणन करून देणे |
| | ७) सह जिल्हानिबंधक कार्यालयात नोंदणी झालेल्या दस्ताची/त्या दस्ताच्या सूचीची प्रमाणित नक्कल देणे | ८) मृत्युपत्राचा सीलबंद लखोटा जमा करणे,परत घेणे व उघडणे |
| | ९) विशेष विवाह कायदा, १९५४अन्वये विवाह संपन्न करणे | १०) विवाह प्रमाणपत्राच्या प्रमाणित नकला देणे |
| | ११) इतर पद्धतीने अगोदरच झालेल्या विवाहाची विशेष कायदा, १९५४ अंतर्गत नोदणी करणे | १२) नॉन क्रिमीलेयर प्रमाणपत्र |
| | १३) जातीचे प्रमाणपत्र | |